सार्वजनिक बांधकाम विभाग (खुद्द) च्या आस्थापनेवरील मुख्य अभियंता तथा सह सचिव हे पद कमी करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक बांधकाम विभाग
## शासन निर्णय क्रमांक : ईएसटी-२०२१/प्र.क्र.३४३/प्रशा-२
## मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक :- १० डिसेंबर, २०२१

<u>संदर्भ</u>:- १) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक : इएसटी-१००१/प्र.क्र.३७/प्रशासन-२, दि.२४ जानेवारी, २००६.
२) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक : ईएसटी-२०२१/प्र.क्र.५६/प्रशासन-१, दि.०३ नोव्हेंबर, २०२१.

**प्रस्तावना :-**

सार्वजनिक बांधकाम विभाग (खुद्द), मंत्रालय, मुंबई कार्यालयाचा ३९२ पदांचा आकृतीबंध संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आला आहे. तसेच संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयान्वये मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नांदेड व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, लातूर ही दोन नवीन कार्यालये स्थापन करुन मुख्य अभियंता, सा. बां. प्रा. विभाग, नांदेड करीता सार्वजनिक बांधकाम विभाग (खुद्द) च्या आस्थापनेवरील "मुख्य अभियंता तथा सह सचिव" हे पद नांदेड येथे स्थलांतरित करुन मुख्य अभियंता तथा सह सचिव या पदाचे नामाभिधान मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नांदेड असे करण्यास मान्यता देण्यात आली आहे. सबब, सदर पद सार्वजनिक बांधकाम विभाग (खुद्द) च्या आकृतीबंधातून कमी करण्याचा प्रस्ताव विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

सार्वजनिक बांधकाम विभाग (खुद्द) च्या आस्थापनेवरील "मुख्य अभियंता तथा सह सचिव" हे पद नांदेड येथे स्थलांतरित झाल्याने सार्वजनिक बांधकाम विभाग (खुद्द) च्या आकृतीबंधातून "मुख्य अभियंता तथा सह सचिव" हे पद कमी करण्यात येत आहे. तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग(खुद्द) च्या आस्थापनेवर कार्यरत असलेले मुख्य अभियंता तथा सह सचिव हे पद स्थलांतरित झाल्याने सदर पदाअंतर्गत कार्यरत असलेले रस्ते-६ व रस्ते-७ या कार्यासनांचे पर्यवेक्षण या आदेशाच्या दिनांकापासून उप सचिव (रस्ते) यांचेकडे सोपविण्यात येत आहे.

२. तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग (खुद्द) च्या आस्थापनेवरील "मुख्य अभियंता तथा सह सचिव" हे पद नांदेड येथे स्थलांतरित करण्याबाबतचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३९९/आ.पु.क.., दि.२४ सप्टेंबर, २०२१ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात आला आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२१०१५०७५५५८१८ असा आहे. सदर शासन निर्णय हा डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADEEP PUNAJI TIRLOTKAR

Digitally signed by PRADEEP PUNAJI TIRLOTKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ccd661813d437193c30b84b205e0a135838bd8252e5bad56d93fea8bfca55a9a, pseudonym=BDE95C233679ED9522D94A7AC04F7CE2EC7BC337, serialNumber=DB6B6957205113E4168ADAD8DB3AEB8B70CD1C42BD3EF06C1B5EB9D26A7BE37E, cn=PRADEEP PUNAJI TIRLOTKAR
Date: 2021.12.10 15:19:27 +05'30'

**( प्रदीप पु. तिर्लोटकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :**

१. मा. मुख्यमंत्री (महाराष्ट्र राज्य) यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा व विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
३. मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम विभाग (सार्वजनिक उपक्रम वगळून), मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम विभाग (सार्वजनिक उपक्रम), मंत्रालय, मुंबई.
५. मा.राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम विभाग (सार्वजनिक उपक्रम वगळून ), मंत्रालय, मुंबई.
६. मा.राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम विभाग (सार्वजनिक उपक्रम), मंत्रालय, मुंबई.
७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
८. सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव / सचिव, मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.सचिव (रस्ते) / सचिव(बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.महालेखापाल, (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१३.महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१४.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१५.अधिदान व लेखाधिकारी, वान्द्रे (पूर्व), मुंबई.
१६.सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७.कार्यासन अधिकारी (आपुक), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. निवडनस्ती - प्रशासन-२.